**जागतिक बँक सहाय्यित केंद्र शासनाद्वारा राबविण्यात येणारा तंत्र शिक्षणाचा दर्जा सुधार कार्यक्रमाचा दुसरा टप्पा राज्यात राबविण्यास मान्यता देणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
शासन निर्णय - क्रमांक TEQIP-२०१०/(०२/१०)/तांशि-२
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३१ मे, २०११.

संदर्भ : १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक डब्ल्यूबीपी २००१/(४७/०१)/व्यशि-५, दिनांक १९ जुलै, २००२.
२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक डब्ल्यूबीपी २००४/(३४१/०४)/(१)/तांशि-६, दिनांक ३१ मार्च, २००४.

**प्रस्तावना** : तंत्र शिक्षणाचा दर्जा सुधार कार्यक्रम केंद्र शासनाव्दारा जागतिक बँकेच्या आर्थिक सहाय्याने राबविण्यात येत आहे. उपरोक्त संदर्भ १ व २ मधील शासन निर्णयानुसार सदर कार्यक्रमाचा पहिला टप्पा राज्यात राबविण्यात येत आहे. या कार्यक्रमाच्या पहिल्या टप्प्यात राज्यातील १७ विविध संस्थांना आर्थिक सहाय्य प्राप्त झाले असून, या आर्थिक सहाय्याच्या मदतीने या संस्थांत मोठया प्रमाणावर आधुनिक सुविधा उपलब्ध झाल्या आहेत. तथा संस्थांत कार्यरत शिक्षकांनाही उच्च दर्जाचे प्रशिक्षण प्राप्त झाले आहे.

तंत्र शिक्षणाचा दर्जा सुधार कार्यक्रमाचा दुसरा टप्पा देशभरात सुरु होत असून यासाठी केंद्र शासनाद्वारा नव्याने संस्थांची निवड प्रक्रिया सुरु झाली आहे. सदर कार्यक्रमाच्या दुसऱ्या टप्पा राज्यात राबविण्यास मान्यता देण्यांचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :

तंत्र शिक्षणाच्या दर्जा सुधार कार्यक्रमाच्या दुसऱ्या टप्प्यात राज्य, राष्ट्र व आंतरराष्ट्रीय स्तरावर अत्यंत वेगाने होणाऱ्या आर्थिक व तंत्रज्ञान क्षेत्रातील विकास विचारात घेऊन, देशांतर्गत कार्यरत अभियांत्रिकी अभ्यासक्रमांच्या पदवी संस्थांतील शिक्षण पध्दतीत गरजेनुसार बदल करुन त्यांना बदलाभिमुखी, दर्जेदार व अधिक कार्यक्षम बनविण्याचे प्रयत्न करण्यांत येणार असून या कार्यक्रमाचे प्रमुख उद्दीष्टये खालीलप्रमाणे आहेत.

१. प्रकल्पात सहभागी संस्थांना उच्च दर्जाचे व रोजगारभिमुखी अभियंता निर्माण करण्यासाठी अधिकाअधिक सक्षम बनविणे.
२. प्रकल्पात सहभागी संस्थांतील पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाची प्रवेशक्षमता वाढविणे व या संस्थात आधुनिक गरजेनुसार संशोधन करण्यास व नवनवीन संकल्पना राबविण्यास प्रोत्साहन देणे.
३. विशिष्ट क्षेत्रात संशोधन करण्यासाठी उत्कृष्टता संशोधन केंद्रांची (Center of Excellence) स्थापना करणे.
४. शिक्षकवृंदास प्रशिक्षित करुन अधिक कार्यक्षम बनविणे.
५. संस्थेतील व शिक्षणपध्दतीतील व्यवस्थापनाची कार्यक्षमता वाढविणे.

२. तंत्र शिक्षणाच्या दर्जा सुधार कार्यक्रमाचा दुसरा टप्पा सुलभपणे राबविण्यासाठी या कार्यक्रमातील कामकाजाचे निम्न नमूद केल्याप्रमाणे विभाजन करण्यांत आले आहे.

अ) सहभागी संस्थांत तंत्र शिक्षणाचा दर्जा सुधारणे.
ब) शिक्षण व्यवस्थापन पध्दतीत सुधारणा करणे.

३. सदर कार्यक्रमात सहभागी होणाऱ्या संस्थांतील तंत्र शिक्षणाचा दर्जा सुधारण्यासाठी या संस्थांना आर्थिक अनुदान उपलब्ध करुन त्याद्वारा संस्थांत अत्याधुनिक सोयीसुविधा, प्रयोगशाळा उभारण्यांत येणार असून त्याद्वारा पदवी व पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाचा दर्जा सुधारण्यांत येणार आहे. सदर कार्यक्रमांत उपलब्ध अनुदानाच्या सहाय्याने पदव्युत्तर पदवी संस्थांतील संशोधनाच्या कार्यास उत्तेजना देणे, काही निवडक संस्थांत उत्कृष्ठता केंद्रांची स्थापना करणे तथा शिक्षकांना अधिक कार्यक्षम बनविण्यासाठी विशेष प्रशिक्षण (Pedagogical Training) इत्यादी कामकाज करण्यांत येणार आहे.

४. तंत्र शिक्षण व्यवस्थापन पध्दतीत सुधारणा करुन तिला अधिक सक्षम बनविण्याचे कामकाज सदर कार्यक्रमांतर्गत स्थापन होणाऱ्या प्रकल्प मागदर्शन समिती, राज्य प्रकल्प सुलभता गट तथा राज्यस्तरीव खाजगी क्षेत्र मार्गदर्शन समितीद्वारा करण्यांत येणार आहे.

५. सदर कार्यक्रमात केंद्रशासन पुरस्कृत योजनेंतर्गत राबविण्यात येणार असून प्रकल्पांतर्गत सहभागी संस्था निम्न नमूद केल्याप्रमाणे अर्थसहाय्यास पात्र असतील.

१. शासकीय व अशासकीय अनुदानित संस्थांवर होणाऱ्या खर्चापैकी ७५% खर्चाचे अनुदान केंद्रशासन उपलब्ध करुन देणार असून उर्वरीत २५% खर्चाची जबाबदारी राज्यशासनाची आहे.
२. कार्यक्रमात सहभागी अशासकीय विना अनुदानित संस्थांसाठी केंद्रशासन ६०% अनुदान उपलब्ध करुन देणार असून उर्वरित ४०% रक्कमेपैकी २०% खर्चासाठी आवश्यक निधी उपलब्ध करण्याची जबाबदारी संबंधित संस्थेची असून २०% रक्कम राज्यशासनाने सदर संस्थाना अनुदान स्वरुपात उपलब्ध करुन द्यावयाची आहे.
३. पदवी अभ्यासक्रमाच्या गुणवत्ता सुधारात सहभागी होणाऱ्या सर्व शासकीय व अनुदानित संस्थांना प्रति संस्था कमाल रु. १० कोटीचे आर्थिक सहाय्य उपलब्ध होणार आहे.
४. पदवी अभ्यासक्रमाच्या गुणवत्ता सुधारात सहभागी होणाऱ्या सर्व अशासकीय विनाअनुदानित संस्थांना प्रति संस्था कमाल रु. ४ कोटीचे आर्थिक सहाय्य उपलब्ध होणार आहे.
५. पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाच्या गुणवत्ता सुधारात सहभागी होणाऱ्या सर्व शासकीय, अशासकीय अनुदानित व विनाअनुदानित संस्थांना प्रति संस्था कमाल रु. १२.५ कोटीचे आर्थिक सहाय्य उपलब्ध होणार आहे.
६. पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमासाठी निवड झालेल्या संस्थातूनच काही संस्थात उत्कृष्टता केंद्र स्थापन करावयाची असून यासाठी केंद्रशासनाने रु. १५० कोटी रक्कम निर्धारित केली असून राज्यात यासाठी होणाऱ्या खर्चापैकी ७५% अर्थसहाय्य केंद्रशासनाचे असणार आहे व उर्वरीत २५% भार राज्य शासनावर पडणार आहे.
७. सदर कार्यक्रमांतर्गत शिक्षकांच्या प्रशिक्षणासाठी होणाऱ्या खर्चापैकी ७५% अर्थसहाय्य केंद्रशासन उपलब्ध करणार असून २५% खर्च राज्यशासनास सोसावा लागेल.
८. शिक्षण व्यवस्थापन पध्दतीत सुधारणा करण्यासाठी ७५% अर्थसहाय्य केंद्रशासन उपलब्ध करणार असून २५% खर्च राज्यशासनास सोसावा लागेल.
९. प्रकल्प व्यवस्थापन, नियंत्रण व मूल्यांकन इत्यादी बाबींसाठी विविध राज्यात राज्य प्रकल्प सुलभता गट स्थापन करण्यासाठी केंद्रशासन ७५% अर्थसहाय्य उपलब्ध करणार असून २५% खर्च राज्यशासनास सोसावा लागेल.

६. उपरोक्त नमूद केल्याप्रमाणे सदर कार्यक्रमाच्या दुसऱ्या टप्प्यात सहभागी होणाऱ्या संस्थांना देय ठरणारे अर्थ सहाय्य १०० टक्के अनुदान स्वरुपात उपलब्ध करावायाचे असून यापैकी शासकीय व अनुदानित संस्थासाठी ७५ टक्के आर्थिक सहाय्य केंद्र शासन उपलब्ध करणार आहे. कार्यक्रमाच्या दुसऱ्या टप्प्यात नव्याने सहभागी होणाऱ्या पदवी स्तरावरील विना अनुदानित संस्थांना उपलब्ध होणाऱ्या आर्थिक सहाय्यापैकी ६० टक्के आर्थिक सहाय्य केंद्र शासन व २० टक्के आर्थिक सहाय्य राज्य शासनाने तथा उर्वरीत २० टक्के खर्च संबंधित संस्थेने करावयाचा आहे. तसेच पदव्युतर पदवी अभ्यासक्रमाचा दर्जा सुधारण्यासाठी सहभागी होणाऱ्या विना अनुदानित

संस्थांना ७५ टक्के आर्थिक सहाय्य केंद्र शासनाव्दारा व २५ टक्के आर्थिक सहाय्य राज्य शासनाव्दारा उपलब्ध करावयाचे आहे.

७. केंद्रशासनाच्या मानव संसाधन विभागामार्फत प्रकल्पाच्या दुसऱ्या टप्प्यात सहभागी देशभरातील संस्थांकडून जाहिरातद्वारा अर्ज मागविण्यात आले आहे. या जाहीरातीस अनुसरुन राज्यातील ४३ संस्थांनी आपल्या पात्रतेनुसार प्रकल्पाच्या योग्य उपविभागात सहभागी होण्यासाठी अर्ज केले आहेत. या संस्थांपैकी ज्या संस्था कार्यक्रमाच्या निकषानुसार कार्यक्रमात सहभागी होण्यासाठी पात्र ठरतील, त्या संस्थांची कार्यक्रमात सहभागी होण्यासाठी केंद्र शासनाद्वारा अंतिम निवड होण्यापूर्वी कार्यक्रमाच्या दिशानिर्देशानुसार राज्य शासनाने या संस्थांना राज्य शासनाद्वारा देय ठरणारा अर्थ सहाय्याचा हिस्सा अनुदान स्वरुपात उपलब्ध करण्याची हमी केंद्र शासनास देणे बंधनकारक आहे. तंत्र शिक्षणाच्या दर्जा सुधार कार्यक्रमाच्या पहिल्या टप्प्यात सहभागी होणाऱ्या विना अनुदानित संस्थांना कार्यक्रमांतर्गत उपलब्ध अर्थसहाय्य अनुदान स्वरुपात प्राप्त होत नव्हते, परंतू या कार्यक्रमाच्या दुसऱ्या टप्प्यात विना अनुदानित संस्थांना देय ठरणाऱ्या आर्थिक सहाय्यापैकी कार्यक्रमाच्या १.१ या भागात सहभागी संस्थांसाठी २०% व कार्यक्रमाच्या १.२ च्या भागात सहभागी संस्थांसाठी २५% आर्थिक सहाय्य राज्य शासनाने अनुदान स्वरुपात उपलब्ध करुन देणे बंधनकारक असल्याने यास तथा तंत्र शिक्षणाचा दर्जा सुधार कार्यक्रमाचा दुसरा टप्पा, सदर टप्प्यासाठी केंद्र शासनाद्वारा तयार करण्यांत आलेल्या Project Implementation Plan मधील तरतूदीनुसार तथा केंद्र शासनाद्वारा वेळोवेळी प्राप्त होणाऱ्या दिशानिर्देशानुसार राज्यात राबविण्यासाठी दिनांक १८.०४.२०११ रोजी झालेल्या बैठकीत मंत्रीमंडळाची मान्यता घेण्यांत आलेली आहे. सदर मान्यतेस अनुसरुन तंत्र शिक्षणाच्या दर्जा सुधार कार्यक्रमाचा दुसरा टप्पा राज्यात राबविण्यासाठी खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यास शासन मान्यता देत आहे.

१. पहिल्या टप्प्यात सहभागी नसलेल्या / असलेल्या ज्या शासकीय, अशासकीय अनुदानित संस्थाची प्रकल्पात निवड होईल अश्या सर्व संस्थांना राज्य शासनाने अदा करावयाचा अर्थ सहाय्याचा हिस्सा अनुदान स्वरुपात उपलब्ध करण्यात यावा.

२. प्रकल्पाच्या उप विभाग -१.१ मध्ये सहभागी होणाऱ्या विना अनुदानित संस्थाना प्रकल्पात मंजूर होणाऱ्या अर्थसहाय्यापैकी २०% व उप विभाग-१.२ मध्ये सहभागी होणाऱ्या विना अनुदानित संस्थाना प्रकल्पात मंजूर होणा-या अर्थसहाय्यापैकी २५%अर्थसहाय्य राज्य शासना द्वारा अनुदान स्वरुपात उपलब्ध करण्यात यावा, परंतु या अर्थसहाय्याद्वारा निर्माण होणाऱ्या सोयी सुविधांचा शिक्षण शुल्क वाढीसाठी विचार करता येणार नाही.

३. प्रकल्पात सहभागी होणाऱ्या शासकीय, अनुदानित व विना अनुदानित संस्थांना स्वायत्ततेसाठी राज्यशासन ना हरकत प्रमाणपत्र देण्यांत यावे.

४. प्रकल्पात सहभागी संस्थात नियामक मंडळांची स्थापना करण्यात यावी.

५. राज्यात प्रकल्प मार्गदर्शन समिती व राज्य प्रकल्प सुलभता गटाची स्थापना करुन या यंत्रणेच्या माध्यमातून सदर कार्यक्रमासाठी केंद्र शासनाद्वारा तयार करण्यांत आलेल्या Project Implementation Plan मधील तरतूदीनुसार तथा केंद्र शासनाद्वारा वेळोवेळी प्राप्त होणाऱ्या दिशानिर्देशानुसार प्रकल्पाचा दुसरा टप्पा राज्यात राबविण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharasthra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०११०६०२१७१०४६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( डॉ. अभय वाघ )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई

मा. मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
मा. सचिव, मनुष्यबळ विकास मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
मा. सचिव, आर्थिक कार्य विभाग, भारत सरकार, नवी दिल्ली.
मा. सचिव, विद्यापीठ अनुदान आयोग, नवी दिल्ली.
मा. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई.
संचालक, राष्ट्रीय परियोजना कार्यान्वयन एकक, एडसिल हाऊस, चतुर्थ तल, १८ ओ, सेक्टर १६ - ए, नोएडा (उ. प्र.)
संचालक, अखिल भारतीय तंत्र शिक्षा परिषद, नवी दिल्ली
संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
सर्व विभागीय सहसंचालक, तंत्रशिक्षण
प्राचार्य, सर्व शासकीय, अनुदानित तथा विना अनुदानित अभियांत्रिकी महाविद्यालये
सचिव, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई
संचालक, महाराष्ट्र ज्ञान महामंडळ, मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
महालेखापाल (लेखापरीक्षा ) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी मुंबई/ निवासी लेखा परीक्षा अधिकारी
कुलसचिव, सर्व विद्यापीठे
वित्त विभाग
मंत्रालयातील इतर सर्व विभाग
सर्व मंत्र्यांचे खाजगी सचिव
सर्व राज्यमंत्र्यांचे खाजगी सचिव
उच्च व तंत्रशिक्षण विभागातील सर्व कार्यासने
महासंचालक, माहिती व जनसंपर्क मंत्रालय, मुंबई
निवडनस्ती तांशि-२